**सामाजिक न्याय विभागांतर्गत नव्याने सुरू करण्यात आलेल्या चेंबूर येथील मागासवर्गीय मुला-मुलींच्या शासकीय वसतिगृहांचे नामाधिकरण करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीसीएच-२०२३/प्र.क्र.१३५ /शिक्षण -२**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०००३२
दिनांक: १० ऑगस्ट, २०२३

वाचा:- १. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, क्र. बीसीएच-२००५/ प्र.क्र. ५४४/ मावक-४, दि. २८ जून, २००७.
२. आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचे पत्र क्र. स.क.आ. /शिक्षण /शावगृ/चेंबूर/महापुरूषांची नावे/ का-५/२०२३-२४/२७३३, दि.२२.५.२०२३

**प्रस्तावना:-**

सामाजिक न्याय विभागांतर्गत मागासवर्गीय मुला-मुलींच्या शिक्षणासाठी शासकीय वसतिगृहे ही योजना राबविली जाते. सदर योजनेंतर्गत संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर आणि लातूर या विभागीय मुख्यालयाच्या ठिकाणी १००० विद्यार्थी क्षमतेची (२५० विद्यार्थी क्षमतेची प्रत्येकी ४ युनिट) प्रत्येकी एक अशी एकूण ७ नवीन शासकीय वसतिगृहे सुरू करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यापैकी मुंबई विभागांतर्गत चेंबूर या ठिकाणी मागासवर्गीय मुला-मुलींसाठी सुरू करण्यात आलेल्या शासकीय वसतिगृहांचे नामाधिकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय:-**

सामाजिक न्याय विभागांतर्गत चेंबूर येथील मागासवर्गीय मुलांच्या शासकीय वसतिगृहास भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर मुलांचे शासकीय वसतिगृह, चेंबूर, जि. मुंबई उपनगर व मुलींचे शासकीय वसतिगृह, चेंबूर या वसतिगृहास माता रमाई आंबेडकर मुलींचे शासकीय वसतिगृह, चेंबूर, जि. मुंबई उपनगर असे नामाधिकरण करण्यात येत आहे. त्यानुषंगाने आवश्यक ती कार्यवाही आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी करावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८११११०२२६३७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUCTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA493C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2023.08.11 11:04:02 +05'30'

**( अ. कों. आहिरे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,राज्यपाल सचिवालय,राजभवन,वाळकेश्वर मार्ग,मलबार हिल,मुंबई,
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय,मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय,मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
४. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव,मुंबई ,मंत्रालय ,
५. मा.विरोधी पक्षनेता,महाराष्ट्र विधानपरिषद,विधानभवन, मुंबई ,

६. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधानभवन, मुंबई
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई,
८. सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई,
९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा /लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
११. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, पुणे,
१२. सह सचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी (सर्व), सा,मुंबई,मंत्रालय,वि.स.वि.व.न्या.
१३. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, मुंबई,
१४. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण विभाग, मुंबई उपनगर,
१५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, मुंबई शहर/उपनगर,
१६. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई शहर/उपनगर,
१७. निवडनस्ती (शिक्षण २).